सन २०१८-२०१९ या वर्षाकरिता
गौण खनिजावरील स्वामित्वधन
वसुलीच्या उद्दीष्टाबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :गौखनि १०/०५१८/प्र.क्र.२०३/ख**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २६ जुलै, २०१८

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या खाण व खनिजे (विकास व विनियमन) अधिनियम, १९५७ मधील नियम १५अनुसार गौण खनिजासंबंधी नियम करण्याचे व स्वामित्वधन निश्चित करण्याचे अधिकार राज्य शासनास प्रदान केले आहेत. त्यानुसार राज्य शासनाने गौण खनिजाच्या विनियमनासंबंधी महाराष्ट्र गौण खनिज उत्खनन (विकास व विनियमन) नियम, २०१३ तयार केलेले आहेत. त्याअनुषंगाने गौण खनिजावरील स्वामित्वधन वसुलीचे सन २०१८-२०१९ चे उद्दिष्ट निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

सन २०१८-२०१९ करिता गौण खनिजावरील स्वामित्वधन वसुलीचे रुपये **२४०००० लक्ष** एवढे उद्दिष्ट राज्यस्तरावरून निश्चित करण्यात आले आहे. या वर्षामध्ये सदर उद्दिष्टाचे जिल्हानिहाय वाटप सोबतच्या विवरणपत्रानुसार करण्यात येत आहे. जिल्हाधिकारी यांनी सदर उद्दिष्ट महानगरपालिका, नगरपरिषदा/नगरपंचायत व ग्रामिण क्षेत्राकरिता ठरवून दयावे व त्याची प्रत शासनास पाठविण्यात यावी.

२. गौण खनिजावरील स्वामित्वधन वसुलीची रक्कम महानगरपालिका क्षेत्र, नगरपरिषदा/ नगरपंचायत क्षेत्र तसेच ग्रामीण क्षेत्रानुसार खालील लेखाशिर्षात जमा करण्यात यावी.

(अ) ०८५३-अलोहयुक्त खाणकाम व धातूशास्त्रीय उद्योग
१०२, खनिजांबाबत सवलत फी, भाडे व स्वामित्वधन,
(०१) (०६) गौण खनिजे उत्खनन नियमान्वये महानगरपालिका क्षेत्रात महसूल विभागांतर्गत मिळणाऱ्या जमा रकमा (०८५३ ०११२)

(ब) ०८५३-अलोहयुक्त खाणकाम व धातूशास्त्रीय उद्योग
१०२, खनिजांबाबत सवलत फी, भाडे व स्वामित्वधन,
(०१) (०७) गौण खनिजे उत्खनन नियमान्वये नगरपरिषदा/नगरपंचायत क्षेत्रात महसूल विभागांतर्गत मिळणाऱ्या जमा रकमा (०८५३ ०१२१)

(क) ०८५३-अलोहयुक्त खाणकाम व धातूशास्त्रीय उद्योग
१०२, खनिजांबाबत सवलत फी, भाडे व स्वामित्वधन,
(०१) (०८) गौण खनिजे उत्खनन नियमान्वये ग्रामीण क्षेत्रात महसूल विभागांतर्गत मिळणाऱ्या जमा रकमा (०८५३ ०१३९)

३. सदर उद्दिष्टपूर्ती दि. ३१ मार्च, २०१९ पूर्वी करण्यात यावी. उद्दिष्ट वसुलीवर सनियंत्रण राहण्याच्या दृष्टीने वसुलीबाबतचा मागील महिन्याचा मासिक अहवाल पुढील महिन्याच्या दहा तारखेपर्यंत विहित केलेल्या नमुन्यात संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर यांना पाठवून त्याची एक प्रत शासनास अग्रेषित करावी. ज्या जिल्ह्यांकडून विहित विवरणपत्रात माहिती प्राप्त होणार नाही त्या जिल्ह्यांतील जिल्हा खनिकर्म अधिकारी व संबंधित उप जिल्हाधिकाऱ्यांना जबाबदार धरण्यात येईल.

४. महसूल अधिकाऱ्यांनी जमेच्या रकमा कोषागारात जमा करतांना चलनामध्ये संगणक संकेतांकासह व त्याबाबतच्या योग्य त्या संपूर्ण तपशीलासह लेखाशिर्ष नमूद करावे. नवीन जमेच्या लेखाशिर्षाप्रमाणे जमा रकमांची वसूली करण्याची जबाबदारी संबंधित नियंत्रक अधिकारी यांची राहील.

५. गौण खनिजावरील स्वामित्वधनाप्रासून प्राप्त जमेच्या नोंदी कोषागारातील आणि लेखापरिक्षा कार्यालयातील नोंदीशी मेळ जमविण्याऱ्या असाव्यात. तसेच जमा रकमांचा वेळोवेळी ताळमेळ घालण्यात यावा.

६. विभागीय आयुक्त यांनी त्यांच्या विभागातील जिल्ह्यांना दिलेल्या उद्दीष्टांच्या अनुषंगाने मासिक विवरणपत्र विचारात घेऊन, सर्व संबंधितांना यथोचित सूचना वेळोवेळी द्याव्यात व उद्दीष्टपूर्तीत विभागातील कोणताही जिल्हा मागे राहणार नाही याची काळजी घ्यावी. प्रत्येक महसूली विभागाने कोणत्याही परिस्थितीत गौण खनिजाचे उद्दीष्ट पूर्ण करणे आवश्यक राहील. यासाठी जरूर तर आपल्या महसूली विभागाचे एकूण उद्दिष्ट कायम ठेवून, संबंधित विभागीय आयुक्त यांना विभागांतर्गत जिल्हयाच्या उद्दिष्टामध्ये आवश्यकतेनुसार फेर बदल करता येईल.

७. गौण खनिजाच्या अवैध उत्खननाची व अनधिकृत वाहतूकीची प्रवृत्ती वाढत असल्याचे दिसून येते, त्यामुळे मंजूर परिमाणापेक्षा जास्त उत्खनन होणार नाही याची काटेकोरपणे दक्षता घेण्यात यावी. तसेच गौण खनिजाच्या उत्खनन स्थळांची वेळोवेळी पाहणी करून केलेल्या उत्खननाची तांत्रीकदृष्टया मोजणी करण्यात यावी. गौण खनिजाच्या विनापरवाना वाहतुकीस आळा बसेल, यादृष्टीने आवश्यक त्या कडक उपाययोजना करण्यात याव्यात. तहसिलदार व उप विभागीय अधिकारी यांनी अवैध उत्खनन व अनधिकृत वाहतुकीस प्रतिबंध करण्याकरिता उप विभाग स्तरावर व तालुकास्तरावर दक्षता पथके स्थापन करावी. अशा पथकांनी केलेल्या कार्यवाहीचा तपशील नोंदविण्यासाठी उपविभाग/तहसील स्तरावर नोंदवही ठेवावी, तसेच सर्व उप विभागीय अधिकाऱ्यांनी दरमहा दक्षता पथकांनी केलेल्या कामाचा आढावा घ्यावा.

८. ज्या जिल्हयात अवैध उत्खनन मोठ्या प्रमाणावर चालू आहे त्या जिल्हयात जिल्हाधिकाऱ्यांनी अवैध उत्खननास आळा घालण्यासाठी विशेष उपाययोजना आखून त्याविषयी विभागीय आयुक्त व शासनास अवगत करण्याची दक्षता घ्यावी.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०७२६१६०२३६३११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Kshirsagar

Digitally signed by Rajendra Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3e673df1a1f6243d932fcb8679fc8cd85d90c61495ae8b4592f8dcc5b8a851a8, cn=Rajendra Kshirsagar
Date: 2018.07.26 16:04:17 +05'30'

**(राजेंद्र क्षीरसागर)**
शासनाचे सह सचिव

सोबत : विवरणपत्र.

**प्रत,**

१. सर्व विभागीय आयुक्त,
२. सर्व जिल्हाधिकारी,
३. संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, जुने सचिवालय इमारत, नागपूर.
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ, नागपूर.
५. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
६. कक्ष अधिकारी, टी-२ /ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
७. निवडनस्ती “ख” कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

| शासन निर्णय क्र. गौखनि १०/०५१८/प्र.क्र. २०३/ख दि. २६/०७/२०१८ चे सहपत्र | |
|---|---|
| सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी गौण खनिजावरील स्वामित्वधन वसूलीचे उद्दीष्ट | |
| जिल्हा | सन २०१८-१९ चे प्रस्तावित उद्दीष्ट (रु. लाखात) |
| मुंबई (शहर) | २५०० |
| मुंबई (उपनगर) | ६१०० |
| ठाणे | १२००० |
| पालघर | ८००० |
| रायगड | १३००० |
| रत्नागिरी | ५५०० |
| सिंधुदुर्ग | ४५०० |
| कोकण विभाग एकूण | ५१६०० |
| नाशिक | ९५०० |
| धुळे | ३५०० |
| नंदूरबार | ३००० |
| जळगांव | ६५०० |
| अहमदनगर | ९००० |
| नाशिक विभाग एकूण | ३१५०० |
| पुणे | १६३०० |
| सातारा | ८००० |
| सांगली | ६००० |
| सोलापूर | ११८०० |
| कोल्हापूर | ४००० |
| पुणे विभाग एकूण | ४६१०० |
| औरंगाबाद | ७२०० |
| जालना | ४५०० |
| परभणी | ४६०० |
| हिंगोली | २१०० |
| बीड | ६००० |
| नांदेड | ८६०० |
| उस्मानाबाद | ५५०० |
| लातूर | ३२०० |
| औरंगाबाद विभाग एकूण | ४१७०० |
| अमरावती | ७५०० |
| बुलढाणा | ६२०० |
| अकोला | ४६०० |
| वाशिम | २५०० |
| यवतमाळ | ६६०० |
| अमरावती विभाग एकूण | २७४०० |
| नागपूर | १३५०० |
| वर्धा | ४७०० |
| भंडारा | ७६०० |
| गोंदीया | ३१०० |
| चंद्रपूर | ७५०० |
| गडचिरोली | ५३०० |
| नागपूर विभाग एकूण | ४१७०० |
| एकूण | २४०००० |